**येरवडा महिला कारागृहातील महिला बंद्यांच्या स्वयंपाकगृहाकरीता मे. महाराष्ट्र नॅचरल गॅस लि. कंपनीच्या पी.एन.जी. गॅस पाईप लाईन जोडणी नंतरच्या उपकरण संचांच्या सयंत्र खरेदी खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- जेएलएम-०९२३/प्र.क्र.१३२/तुरुंग-२**
दुसरा मजला, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ३१ जुलै, २०२४

**वाचा :-**

**१.** वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३ /प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दि. १७.०४.२०१५.

**२.** गृह विभाग, शासन निर्णय क्र. जेएलएम-०६१७/प्र.क्र.७३/तुरुंग-२, दि. २७.०१.२०२०

**३.** गृह विभाग, शासन निर्णय क्र. जेएलएम-०९२३/ प्र.क्र.१३२ तु-२ दि.१८.१०.२०२३

**४.** अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, पुणे यांचे पत्र जा.क्र. इप्र/सीएनजीगॅस /यंत्रसामुग्री/खेरदी/३०४६/ २०२४ / पवि-५ (२) पुणे, दि. १५.०७.२०२४

**प्रस्तावना :-**

येरवडा महिला कारागृहातील महिला बंद्यांच्या स्वयंपाकगृहाकरीता मे. महाराष्ट्र नॅचरल गॅस लि. कंपनीच्या पी.एन.जी. प्रकल्पास कारागृहाच्या आतील परिसरात पाईपलाईनद्वारे उपलब्ध होणाऱ्या पाईप जोडणीच्या संदर्भ क्र.३ अन्वये रू.४,४७,१३०/- खरेदीच्या खर्चास प्रशासकीय मंजूरी देण्यात आली आहे.

अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या दि. १५.०७.२०२४ च्या पत्रान्वये येरवडा महिला कारागृहात पी.एन.जी. गॅस पाईप लाईन जोडणीनंतरच्या उपकरण संच, संयंत्र खरेदीस प्रशासकीय मंजूरी मिळणेबाबतचा प्रस्ताव झाला आहे.

त्यानुसार खरेदी करण्यासाठी सदर पाईप जोडणी, यंत्रसामुग्री व उपकरण संच हे आकाराने मोठे असल्याने व Gem Portal वर उपलब्ध नसल्याने प्राप्त स्थानिक बाजारामधील Pune Pipe Gas Co. पुणे यांचेकडून प्राप्त झालेले दरपत्रकानुसार PNG प्रकल्पाचे स्वयंपाकगृहातील अंतर्गत पाईप जोडणी व उपकरणसंच, यंत्रसामुग्री खरेदी करण्यास प्रशासकीय मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

येरवडा महिला कारागृहातील महिला बंद्यांच्या स्वयंपाकगृहाकरीता मे. महाराष्ट्र नॅचरल गॅस लिमिटेड या कंपनीच्या पी.एन.जी. गॅस पाईप लाईन जोडणी नंतरच्या ( आधुनिक गॅस शेगडी, गॅस पाईप, रेग्युलेटर व्हॅल, गॅस बर्नर इ.) उपकरण संच, सयंत्र खरेदीच्या रु.३,४८,६९६/-(रुपये-

तीन लक्ष अठ्ठेचाळीस हजार सहाशे शहाण्णव फक्त) एवढ्या रकमेच्या खर्चास या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. या प्रकरणी होणारा खर्च मागणी क्र. बी-५, २०५६ तुरुंग, १०१ तुरुंग, (००)(०१) मध्यवर्ती तुरुंग (दत्तमत) (२०५६ ००३५) अनिवार्य, **१९ आहार खर्च** या लेखाशिर्षातंर्गत सन २०२४-२५ या वित्तीय वर्षात उपलब्ध होणाऱ्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा. सदर अनुदान खर्चाबाबतचे मासिक विवरणपत्र व उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

३. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम, भाग-२, दि.१७.०४.२०१५ चे परिशिष्ट वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग २, अ.क्र.४ नियम क्र.७ अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०७३११७२०५४३८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VINAYAK SADASHIV CHAVAN

Digitally signed by VINAYAK SADASHIV CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=3d6fb52eeb39bf3c4a0001ceaa97736aa6fb733903d657c4d7b6e66cdadfd6fd, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=1DB7A03BD2B7B1CF5AFDC7A4A26DC14D44297AA2B63F7493C19351A3D51630D0, cn=VINAYAK SADASHIV CHAVAN
Date: 2024.07.31 17:35:57 +05'30'

**( विनायक चव्हाण )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१.अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
२.अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक,कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे,
३.कारागृह उप महानिरीक्षक (मुख्यालय), महाराष्ट्र राज्य, पुणे,
४. कारागृह उप महानिरीक्षक, पश्चिम विभाग, पुणे,
५.महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा), महाराष्ट्र राज्य (१/२), मुंबई/ नागपूर,
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
७. निवासी लेखा परीक्षा, मुंबई,
८.संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
९.जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे,
१०. क.अ. (बीयुडी-१) गृह विभाग, मंत्रालय, मुंबई -३२,
११. अधीक्षक, येरवडा महिला कारागृह , पुणे,
१२.निवड नस्ती (तुरुंग-२), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.